The Department of Public Instruction, Bombay.

# THE NATIVE METHOD OF BOOK-KEEPING,

CONTAINING

A SERIES OF QUESTIONS AND ANSWERS.

# जमाखर्चाची पद्धति.

( कीर्दखतावणीसहित प्रश्नोत्तररूपानें. )

( हें पुस्तक मूळचें वासुदेव बाळकृष्ण लोखंडीकर यांनी केलें होतें. )

तें,

ह्या आवृत्तीकरितां,

नारायण बल्लाळ लिमये,

यांनी

शोधून, वाढवून, तयार केलें.

आठवी आवृत्ति.—२५,००० प्रती.



मुंबई:
गवर्नमेंट सेंट्रल बुक डीपो.

इसवी सन १८९०.



किंमत १॥ आणा.

# जमाखर्चाची पद्धति.

## ( कीर्दखतावणीसहित प्रश्नोत्तररूपानें ).

१ प्रश्न—जमा व खर्च ह्मणजे काय ?

उत्तर—दुसऱ्याकडून रोख अगर अन्यतऱ्हेनें जो पैसा आपणाकडे [illegible] त्याचें नांव जमा व आपणाकडून रोख अगर अन्यतऱ्हेनें जो पैसा दुसऱ्याकडे गेला त्याचें नांव खर्च, ( खर्चाकडील रकमेस नांवें असेंही ह्मणतात ).

२ प्र०—जमाखर्चाचे किती कागद असतात ?

उ०—मुख्य दोन कागद असतात.

३ प्र०—त्यांची नांवें काय ?

उ०—कीर्द व खतावणी, (कीर्दीसच कोणी शिलकबंद असेंही ह्मणतात).

४ प्र०—कीर्द कशास ह्मणतात ? आणि कीर्द व शिलकबंद यांत काय [illegible] आहे ?

उ०—आलेला व दिलेला पैसा रोख असो किंवा अन्यतऱ्हेनें आलेला व [illegible] असो ज्या कागदांत लिहून शिलक काढितात यास कीर्द ह्मणतात. कीर्द व शिलकबंद यांत लिहिण्यांत कांहींएक फरक नाहीं, कीर्द शिवलेली असते व शिलकबंदाचे कागद निरनिराळे सुटे असून जमेचे निराळे एकांतएक तसेंच खर्चाचे निराळे एकांतएक घालून ठेवण्याची वहिवाट आहे. पेशवाईंत जमाखर्चाचे शिलकबंद असत परंतु हल्लीं कीर्दीच्या चोपड्यांची वहिवाट सुरू आहे; [illegible] पि कोठें कोठें लोकांचे घरीं शिल[illegible].

५ प्र०—खतावणी ह्मणजे काय ?

उ०—कीर्दींत ज्या रकमा निरनिराळ्या [illegible] जमा अगर नांवें लिहितात, त्या सर्व [illegible], त्या त्या [illegible] खातीं घालून त्या खात्यां दाखल करण्याचा [illegible] मेळाच [illegible] खतावणी ह्मणतात.

६ प्र०—रोजखर्डा कशास ह्मणतात ?

उ०—जमा किंवा खर्च होतांच वेळच्यावेळीं कीर्द लिहिण्यास स्वतंत्र मनुष्य नसल्या कारणानें ज्या कागदावर टिपणादाखल लिहून ठेवितात, व पुढें फुरसतीनें ज्यावरून कीर्द लिहितात, त्यास रोजखर्डा असें ह्मणतात. रोजखर्डा ठेवण्याची ज्याची वहिवाट आहे, त्याचे कीर्द [illegible] त्यास न घेतां रोजखर्डा घे-

तात. रोजखर्ड्यास कच्ची वही व कीर्दीस पक्की वही असेंही ह्मणतात. रोजखर्डा व कीर्द यांत लिहिण्यांत कांहीं फेर नाहीं. रोजखर्ड्यांत चुकीनें जमा किंवा नांवें रकम पडली तर उलट जमाखर्चानें सुधरून न घेतां खोडून टाकीत असतात.

७ प्र०—कीर्दीचा उपयोग काय ?

उ०—आपणापाशीं शिल्लक किती, व कोणत्या इसमाकडून जमा किती व कशाबद्दल आली, व दुसऱ्यास पैसा दिला किती व कशाबद्दल हें तिजवरून तपशीलवार समजतें.

८ प्र०—कीर्दीत जमा कोणीकडे व खर्च कोणीकडे लिहितात ?

उ०—कीर्दीचे पानाचे उभे दोन भागांपैकीं डावे हाताकडे शिलकेखालीं जमा व उजवेकडे खर्च लिहितात.

९ प्र०—नवीन कीर्द लिहिण्यास आरंभ केव्हां करितात, व वर्ष कोठपर्यंत धरितात ?

उ०—कित्येक कार्तिक शुद्ध १ पासून आरंभ करून आश्विन वद्य ३० पर्यंत वर्ष धरितात. कित्येक चैत्र शुद्ध १ पासून आरंभ करून फाल्गुन वद्य ३० पर्यंत वर्ष धरितात. कित्येक मृगसालापासून आरंभ करून दुसरे मृगसालापर्यंत वर्ष धरितात. सरकारी चोपडीस ता० १ एप्रिल पासून आरंभ करून मार्च अखेरपर्यंत वर्ष धरितात. अलीकडे कित्येक जानेवारीपासून दिसेंबर अखेरपर्यंतही वर्ष धरितात.

१० प्र०—कीर्दीस आरंभ कसा करावा ?

उ०—आरंभीं कीर्द जमाखर्चाची खासगत, मालकाचें नांव, बिनांव व राहण्याचें ठिकाण लिहून इस्तकबिल मिती (तारीख) महिना, वार, शक (सन) पासून तागायत मिती (तारीख) महिना, वार, शक (सन) पर्यंत लिहून नंतर त्याखालीं स्वतंत्र बीत (प्र० ७३ पहा.) ओळ काढून त्या ओळीस मिती (तारीख), महिना, शक (सन) लिहून नंतर डावीकडील अर्धावर रेघ काढून तिचे आरंभीं जमा व शेवटास रुपये असें ह्मणावें; व उजवीकडेस तशीच रेघ काढून तिचे आरंभीं खर्च (नांवें) व शेवटास रुपये असें लिहावें. नंतर त्याखालीं जमेकडे पूर्व दिवसाची शिल्लक असेल तो आंकडा घालून त्यासमोर शिल्लक रोजगुदस्त, महिन्याचे आरंभीं माहेगुदस्त, व सालाचे आरंभीं सालगुदस्त, असें लिहून त्याखालीं दुरेघी मारावी. त्याखालीं बीत ओळ काढून तिजवर जमा रोजमजकूर, माहेमजकूर, अगर सालमजकूर, असें लिहून खालीं येईल ती जमा क्रमानें लिहावी.

११ प्र०—कीर्दीचे प्रकार किती व ते कोणते ?

उ०—कीर्दीचे प्रकार दोन, एक रोजकीर्द (धांवरी कीर्द) व दुसरी बैठी कीर्द.

१२ प्र०—रोजकीर्द ह्मणजे काय?

उ०—जींत रोजच्या रोज जमाखर्च लिहून शिल्लक काढितात ती.

१३ प्र०—बैठीकीर्द ह्मणजे काय व ती ठेवण्यांत काय नफानुकसान आहे?

उ०—जींत महिन्याचा अगर कांहीं मुदतीचा जमाखर्च लिहून, शेवटीं शिल्लक काढितात ती. यांत रोजकीर्दीप्रमाणें सर्व तपशील असून रकमेस मिती लावतात. ज्यांचा व्यापार थोडा असून रोजच्यारोज जमाखर्च थोडे होतात त्यांनीं दररोज शिल्लक न मिळविली तरी चूक पडण्याचा संभव नाहीं. त्यांनीं रोज कीर्द न ठेवितां बैठी कीर्द ठेविली तरी चालेल. परंतु ज्याचा व्यापार मोठा असून दररोज जमाखर्च फार करावे लागतात त्यांची शिल्लक दररोज मिळविली नाहीं तर मोठा घोळ पडेल सबब त्यांनीं रोजकीर्द ठेविलीच पाहिजे.

१४ प्र०— जमाखर्च करते वेळेस कोणकोणत्या गोष्टी लक्षांत ठेविल्या पाहिजेत?

उ०—जमाखर्च करते वेळेस चूक न व्हावी ह्मणून पहिली गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही. रोख रुपये येतील ते अगोदर मोजून शिलकेंत टाकावे नंतर चोपडींत ल्याहावे व रोख रुपये देणें असल्यास ते पहिल्यानें चोपडींत नांवें लिहून नंतर ज्या इसमास द्यावयाचे त्यास द्यावे. दुसरी गोष्ट रकम रोखी आहे अगर जमाखर्ची आहे हें पाहून रोख आली असल्यास जमा, व दिली असल्यास खर्च (नांवें) लिहावी व जमाखर्ची असल्यास जमा करून खर्चीही लागलीच लिहावी, कारण, शिलकेस ताळा मिळाला पाहिजे.

१५ प्र०—दुसऱ्याकडून आलेला पैसा जमा कसा करावा?

उ०—जे रुपये जमा करावयाचे त्यांचा जमेकडे सदरीं आंकडा घालून त्याचे समोर ओळ काढून ज्या बाबीचे खात्यास ती रकम जमा करण्याची, तें खातें लिहावें. नांवाचे खात्यास जमा करणें असेल तर, नांव, बिनांव, राहण्याचें ठिकाण, घालून पुढें 'खातें' असें ह्मणावें; नंतर तपशील लावून गुजारत किंवा हस्तें, रुपये आणून देणाराची लिहावी. व त्याखालीं दुरेघी मारून त्यास खातेंपान असें लिहावें, आणि ती रकम खतावणीस बार झाली ह्मणजे खतावणीचे ज्या पानावर ती बार केली असेल त्या पानाचा अंक तेथें घालावा. ह्मणजे त्या अंकावरून ती रकम खतावणींत लवकर सांपडेल. तपशील लिहितेवेळेस ज्या इसमाचें किंवा बाबीचे नांवावर जमा अथवा खर्च घालणें असेल त्या इसमाचें

किंवा बाबीचें नांव अगदीं प्रथम घालावें ह्मणजे रकम सांपडण्यास व खतावणी करण्यास फार उपयोग होतो.

१६ प्र०—दुसऱ्यास दिलेला पैसा नांवें ( खर्च ) कसा लिहावा ?

उ०—दिलेल्या रकमेचा आंकडा सदरीं उजवेकडील अर्धाचे आरंभीं घालून त्यापुढें जमेप्रमाणें तपशील लिहावा. ज्या बाबीचे किंवा इसमाचे खातीं रकम पडावयाची त्या बाबीचें किंवा इसमाचें नांव प्रथम लिहावें, नंतर तपशील लिहावा.

१७ प्र०—ज्या दिवशीं जमाखर्च नसतो त्या दिवसाची कीर्द कशी लिहितात ?

उ०—अगोदरचे तारिखेची शिल्लक जमा करून कीर्दींत मिती तारीख ( अमुक ) जमाखर्च ( ० ) असें लिहितात, आणि शिल्लक पुढचे तारखेकरितां काढितात.

१८ प्र०—कीर्दींतील कोणत्या रकमेला खातेंपान लागत नाहीं ?

उ०—शिलकेच्या रकमेला मात्र खातेंपान लागत नाहीं.

१९ प्र०—जमाखर्चांची रकम किती प्रकारांनीं येते ?

उ०—रोखी आणि जमाखर्ची अशा दोन प्रकारांनीं येते.

२० प्र०—रोखी आणि जमाखर्ची ह्मणजे काय ? व जमाखर्ची रकमेस तपशील कसा करतात ?

उ०—ज्या रकमेचा ऐवज शिलकेंत प्रत्यक्ष येऊन मिळाला अगर शिलकेंतून प्रत्यक्ष कमी झाला ती रोखी होय. ज्या रकमेचे ऐवजानें शिल्लक कमजास्त झाली नाहीं; परंतु व्यवहार असा झाला कीं, तेणेंकरून एके इसमाचें देणें अगर घेणें होतें तें दुसऱ्याचे नांवावर चढलें, अगर अजी कमजास्त झालें; तर या व्यवहारानें जी रकम कीर्दींत येईल ती जमाखर्ची होय. त्याचा जमाखर्च करतेसमयीं एकच रकम जमा व नांवें एकदम एका वेळेस करावी लागते तेव्हां प्र० १५ व प्र० १६ यांत लिहिल्याप्रमाणें रकमेस तपशील करून जमेकडेस तपशिलाचे शेवटीं ज्या खात्यास नांवें पडावयाची त्या खात्यास नांवें लिहून असें लिहितात व नांवें कडेस लिहितेसमयीं तपशील झाल्यावर ज्या खात्यास जमा पडावयाची त्या खात्यास जमा करून असें लिहितात.

२१ प्र०—रोज शिल्लक कशी काढितात ?

उ०—दर दिवशीं रोजचा जमाखर्च झाल्यावर जमेची जमेकडे व खर्चाची खर्चाकडे याप्रमाणें बेरजा करितात, नंतर जमेकडील बेरजेंतून खर्चाकडील बेरीज वजा करून बाकी राहील ती शिल्लक; ती शिल्लक पेस्तर रोजाका-

रणें त्याच दिवशीं खर्च लिहून बेरीज करितात, म्हणजे जमेची व खर्चाची बेरीज बरोबर होते.

२२ प्र०—महिन्यांत एकंदर जमा किती व खर्च किती हें कसें समजेल ?

उ०—महिना पुरा झाला म्हणजे कीर्दीवरून महिन्याचें तेरीज करावें तें असें कीं, महिन्यांतील सर्व दिवसांच्या जमेच्या जमेकडे व खर्चाच्या खर्चाकडे एकाखालीं एक अशा बेरजा मांडून त्यांची निरनिराळी बेरीज करावी म्हणजे ज्या बेरजा येतील तो महिन्यांतील एकंदर जमाखर्च असें समजावें. बैठ्याकीर्दीत जमा किती व खर्च किती, हें समजण्यास तेरीज करणें नको; कीर्दीवरूनच समजेल.

२३ प्र०—महिन्याचा जमाखर्च बरोबर आहे असें कसें समजेल ?

उ०—एकंदर जमेकडील बेरजेंत महिन्याच्या पहिल्या दिवसाचे आरंभीं असलेली शिल्लक मिळवावी, व खर्चाकडील बेरजेंत महिन्याचे अखेर दिवसाचे शेवटीं नांवें लिहिलेली शिल्लक मिळवावी म्हणजे दोन्ही बेरजा बरोबर होतात; असें केलें असतां समजेल.

२४ प्र०—कीर्द व खतावणी यांपैकीं महत्त्वाचा कागद कोणता ?

उ०—दोनीही कागद महत्त्वाचे आहेत. एक कमी व एक जास्ती असें म्हणतां येत नाहीं. कीर्दीत प्रत्येक रकमेस पूर्ण तपशील असून आपणाजवळ शिल्लक किती आहे हें मात्र समजतें परंतु प्रत्येक कुळाकडेस बाकी येणें किती हें त्यावरून समजत नाहीं तें खतावणीवरून समजतें. (प्र० ४३ पहा.) खतावणी वक्तशीर तयार असल्यानें बाकीबद्दल कुळास तगादा करून वसूल करण्यास ठीक पडतें तेव्हां दोनीही कागद व्यापाराचा उद्देश सिद्धीस नेण्यास सारखे महत्त्वाचे आहेत. (प्र० ७१ पहा.)

२५ प्र०—कीर्द हरवली तर पूर्वीप्रमाणें तयार करितां येईल कीं नाहीं ?

उ०—पूर्वीप्रमाणें तयार करितां येणार नाहीं, परंतु बहुधा तपशिल शिवाय खतावणीवरून तयार करितां येईल.

२६ प्र०—कीर्दीतील रकम खतावणीस नेणें ती कशी न्यावी ?

उ०—कीर्दीतील रकम जमेची जमेकडे व खर्चाची खर्चाकडे, ज्याचे त्याचे खात्यांत खतावणीस बार करून मिती (तारीख), महिना लावून त्यापुढें कीर्दपान असें लिहून कीर्दीच्या ज्या पानावर ती रकम लिहिली असेल त्या पानाचा अंक तेथें घालावा. अथवा, कोणी जमेकडेस व नांवेंकडेस सदरीं महिना घालून त्या पोटीं रकमा बार करतात व त्यांची एकंदर बेरीज सदरीं घा-

लतात; ह्मणजे प्रत्येक रकमेस महिना लिहिणें नको, असें केल्यानें खतावणीवरून तेरीज करण्यास सुलभ पडतें.

२७ प्र०—कीर्दीतील रकम खतावणींत लवकर कशी सांपडेल ?

उ०—कीर्दीतील रकमेखालीं दुरेघी मारून खतावणीचे पानाचा अंक लाविलेला असतो त्यावरून लौकर सांपडेल.

२८ प्र०—कीर्दीतील प्रत्येक महिन्याच्या सर्व रकमा खतावणीस बरोबर वार झाल्या किंवा नाहींत हें कसें समजेल ?

उ०—महिनाअखेर खतावणीवरून तेरीज तयार केलें जातें त्यावरून सर्व रकमा खतावणींत बरोबर वार झाल्या असें समजेल ?

२९ प्र०—कीर्दीतील एखादी रकम नजरचुकीनें खतावणींत नेणें राहिली तर ती चूक कोठें समजेल ?

उ०—खतावणीवरून कीर्दींत जें हें तेरीज करितात त्यांत समजेल.

३० प्र०—कीर्दीतील कोणत्या रकमा खतावणीस जात नाहींत ?

उ०—शिलकेच्या रकमा मात्र खतावणीस जात नाहींत.

३१ प्र०—कीर्दींत रकम खर्च झाली नसून खर्चाकडे पडते अशी रकम कोणती ?

उ०—अखेर शिल्लक.

३२ प्र०—कीर्द व खतावणी ह्या मेळानें केव्हां असतात ?

उ०—शिलकेशिवाय रोज मेळानें असतात.

३३ प्र०—हवाल्याचा जमाखर्च कसा करितात ?

उ०—ज्या मनुष्यानें हवाला घेतला असेल त्याच्या नांवें ती हवाल्याची रकम लिहावी व हवाला देणाराचे नांवें ती रकम जमा करावी.

३४ प्र०—परत आलेल्या मालाचा जमाखर्च कसा करावा ?

ज्यानें माल परत केला त्याचे नांवें मालाची किंमत जमा करून खरेदीखातीं नांवें लिहावी, परंतु लागलाच रोख पैसा देणें आहे तर माल परत आणणाराच्या नांवें जमा न करितां खरेदीखात्यास नांवें लिहून रोख पैसा द्यावा.

३५ प्र०—उधारी मालाचा जमाखर्च कसा करावा ?

उ०—ज्याकडून माल घेतला त्याचे नांवें मालाची किंमत जमा करून खरेदीखातीं नांवें लिहावी, व दुसऱ्यास माल उधारी दिला तर मालाची किंमत खरेदीखात्यास जमा करून उधार घेणाराचे नांवें लिहावी.

३६ प्र०—माल आणण्याकरितां झालेल्या खर्चाचा जमाखर्च कसा करितात ?

उ०—जो खर्च होईल तो खरेदीखात्यास खर्च लिहितात ?

३७ प्र०—कोणाकडे रुपये येणें असून त्याजबद्दल माल घेतला तर याचा जमाखर्च कसा करावा ?

उ०—मालाची किंमत करून ती माल देणाराचे नांवें जमा करावी व खरेदीखातीं नांवें लिहावी.

३८ प्र०—व्यापाऱ्याच्या मालांतून कांहीं माल इतर कामाकडे घेतला तर त्याचा जमाखर्च कसा करावा ?

उ०—जिनसाची किंमत जिनसाचे खातीं जमा करून ज्या कामाकडे तो माल घेतला त्या खातीं नांवें लिहावी.

३९ प्र०—सालअखेर अगर केव्हांही शिल्लक मालाचा जमाखर्च करणें तो कसा करावा ?

उ०—शिल्लक मालाची किंमत मोजदादीचे दिवशीं जो भाव असेल त्याप्रमाणें करून मालाचे खातेवार जमा करावी व खरेदीचे खातीं नांवें लिहावी; कित्येक लोक जमाखर्च न करितां शिल्लक माल जमा करून शिलकेंत ओढतात; व शिलकेस तपशील रोख अमुक, व मालाबद्दल अमुक, असा दाखवितात.

४० प्र०—कमिशन( वर्तांळ्या)चा जमाखर्च कसा करितात ?

उ०—ज्या खरेदीचा वर्तांळा नियमित असतो अशी कांहीं खरेदी केली तर खरेदीस पडलेली किंमत वर्तांळ्यासुद्धां खरेदीखातीं नांवें लिहून जेवढा वर्तांळा मिळाला असेल तेवढी रकम नफातोटाखातीं जमा करावी आणि वर्तांळा दिला असतां सर्व रकम जिनसाची जमा करून नफातोटाखातीं नांवें लिहावी.

४१ प्र०—एकादे खातीं रोखीची रकम जमा करावयाची असून खर्च, अगर खर्च लिहावयाची असून जमा झाली तर ती चुकी केव्हां कशी आढळेल व तिचा जमाखर्च कसा करावा ?

उ०—ती चुकी सायंकाळीं शिल्लक मोजतेवेळीं आढळेल. रकम जमा करावयाची असून खर्च पडली तर दोन वेळां ती रकम जमा करावी आणि खर्चाची रकम जमा झाली तर दोनवेळीं खर्च (नांवें) लिहावी व चुकीनें झाली आहे असा तपशील लिहावा.

४२ प्र०—एकाचे खात्यास रकम लिहावयाची असून दुसऱ्याचे खात्यास लिहिली तर ती चुकी केव्हां आढळेल ?

उ०—कुळांची रुजवात होईल त्या वेळेस.

४३ प्र०—खतावणीचा उपयोग काय ?

उ०—कोणत्या इसमाकडे येणें व देणें किती हें एके ठिकाणीं समजतें.

४४ प्र०—खातें ह्मणजे काय ?

उ०—कोणत्याही इसमाचें अगर बाबीचें येणें व देणें समजण्याकरित इसमाचे अगर बाबीचे नांवें जो एका ठिकाणीं जमाखर्च ठेवितात त्यास खातं असें ह्मणतात.

४५ प्र०—खातें न ठेविल्यानें काय होईल ?

उ०—कोणत्याही इसमाचें अगर बाबीचें येणें व देणें एके ठिकाणीं समजणार नाहीं.

४६ प्र०—खतावणींत खातें कसें घालितात ?

उ०—खतावणीचे पानावर खातें (अमुक) याप्रमाणें ज्या इसमाचें अगर बाबीचें खातें घालावयाचें त्याचें नांव लिहून त्याखालीं कीर्दीप्रमाणें जमाखर्चाचे सशेच्या रेघा काढून त्यांस जमा रुपये व खर्च ( नांवें ) रुपये असें लिहितात.

४७ प्र०—खतावणींत रकम बार कशी करावी ?

उ०—प्रथम रकमेचा आंकडा घालून मिती ( तारीख ), महिना व कीर्दपानाचा अंक घालावा. ( प्रश्न २६ पहा. ) महिना सदरीं घातल्यास पोटच्या रकमेस महिना घालण्याचें कारण नाहीं.

४८ प्र०—खतावणींतील खातें लौकर कसें सांपडेल ?

उ०—खतावणीचे आरंभीं खतावणींतील खात्यांचीं नांवें अक्षर िलहवारीनें लिहावीं; आणि नांवांचे पुढें खतावणीच्या पानांचा अंक घालावा. ों पाहिलीं असतां खातं कोणत्या पानावर आहे हें सुलभ रीतीनें सांपडेल.

४९ प्र०—खातेंपान भरलें आणि त्या खात्यास रकमा बार करणें अस तर त्या बार कशा कराव्या ?

उ०—खात्याची जमेकडील व खर्चाकडील बेरीज ज्याच्या त्याच्या बाजूस शेवटीं करून इसमाचें अगर बाबीचें पुरवणीखातें मोकळें असलेले पानावर घालावें आणि त्याखालीं जमेकडे व खर्चाकडे तेरीज पान ( अमुक ) असें लिहून तेथें पूर्वीचे पानावरील बेरजा मांडाव्या व खालीं चालू रकमा बार कराव्या आणि पूर्वीचे खात्याखालीं नवीन खातें घातलेले पानाचा अंक घालावा.

५० प्र०—खातीं किती प्रकारचीं आहेत ?

उ०—जितक्या नांवांनीं रकमा जमा अगर नांवें लिहिणें असतील तितक्या प्रकारचीं खातीं असतात, अमुकच खातीं असावीं असा नियम नाहीं. ज्या हिशोबांत इतर लोकांशीं व्यवहार नसतो, त्या ठिकाणीं खातीं इसमवार नसतात; परंतु धर्मादाय तैवज वगैरे वेगळाले सदराचीं खातीं वेगळालीं करितात त्या ठिकाणीं खात्यांचे ऐवजीं वेगवेगळालीं [illegible]

धर्मादायखर्च, नेमणूकखर्च, तैवजखर्च, बाजेखर्च. परंतु पक्कीं खातीं, कच्चीं खातीं व तोंड मिळविणीचीं खातीं यांत सर्व प्रकारचीं खातीं येतात.

५१ प्र०—पक्कीं खातीं ह्मणजे काय ?

उ०—ज्या खात्यांतील रकमा जमा अगर नांवें लिहिल्या असतील त्या खात्यांतील रकमेचा पुनः जमाखर्च करावा लागत नाहीं तीं पक्कीं खातीं. ह्मणजे ज्या इसमाशीं व्यवहार आहे त्याचीं.

५२ प्र०—कच्चीं खातीं ह्मणजे काय ?

उ०—कच्चीं खातीं ह्मणजे, पक्क्या खात्यांस जमाखर्च करण्याची सवड नसून ज्या खात्यास जमाखर्च करितात, तीं;—तसलमात, रवानगी, अमानत.

५३ प्र०—तोंडमिळवणीचीं खातीं ह्मणजे काय ?

उ०—व्यापारांत निरनिराळे बाबींत खर्च किती झाला व जमा किती आली हें समजण्याकरितां खातीं घालतात तीं न घातलीं तर खासगी खात्यास त्याचा जमाखर्च करितां येईल. जसें, खर्चखातें, व्याजखातें, नफातोटाखातें, पगारखातें, हुंडणावळखातें वगैरे. त्यांचा सालअखेरीस तोंडमिळवणीकरितां पुनः जमाखर्च करून पक्क्या खात्यांत मुरवल्या जातात अशीं जीं खातीं तीं. (प्र० ७० पहा.)

५४ प्र०—बोटखत ह्मणजे काय ?

उ०—हा एक खतावणीचा प्रकार आहे तो असा कीं, निरनिराळ्या सदराच्या रकमा निरनिराळ्या ठिकाणीं असतात त्या ज्या त्या सदराखालीं एकत्र करण्याकरितां जो कागद करितात त्यास बोटखत असें ह्मणतात. जसें, पहाणीपत्रकीं व पेरेवार पत्रक यांजवरून बोटखत घालतात तें असें, एका इसमाकडे अनेक जमिनी असून, एकेका जमिनींत अनेक धान्यें पेरिलीं असतात त्या सर्व जमिनींतील एकेका प्रकारचीं धान्यें, त्या इसमाकडे किती झालीं, तें समजण्यासाठीं टिपण करावें लागतें तें.

५५ प्र०—भांडवलखातें ह्मणजे काय ?

उ०—व्यापार अगर अन्य कोणत्याही कामासाठीं वेगळा काढलेला पैसा ज्या खातीं जमा करितात त्यास भांडवलखातें ह्मणतात.

५६ प्र०—खर्चखातें ह्मणजे काय ?

उ०—प्रपंचास किंवा अशा तऱ्हेनें दुसऱ्या कामाकडेस जो पैसा खर्च करावा लागतो तो ज्या खातीं खर्च लिहितात त्याचें नांव खर्चखातें.

५७ प्र०—धर्मादायखातें ह्मणजे काय ?

उ०—कोणत्याही तऱ्हेनें धर्मार्थ जो पैसा खर्च केला तो ज्या खातीं
[illegible]

५८ प्र०—खरेदीखातें ह्मणजे काय ?

उ०—व्यापाराकरितां जो माल खरेदी घेतात त्याचे खरेदीची रकम ज्या खातीं खर्च लिहितात तें खरेदीखातें.

५९ प्र०—खरेदीखात्यांत रकम लिहून अनेक जिनसांची खरेदी केली तर कोणत्या जिनसास किती पैसा पडला व प्रत्येक जिनसांत नफातोटा काय झाला हें कसें समजेल ?

उ०—खरेदीखात्यास नांवें पडलेली रकम जमा करून जे जिन्नस खरेदी केले त्यांचीं निरनिराळीं खातीं घालावीं, आणि पैसा पडलेला असेल त्याप्रमाणें त्या त्या खात्यास त्या रकमा नांवें लिहाव्या, व विक्रीचा पैसा त्या त्या खात्यास जमा करावा, ह्मणजे नफातोटा समजेल.

६० प्र०—जिन्नसवार खातीं पुरीं कशीं करावीं ?

उ०—सालअखेरीस शिलक मालाचा जिन्नसवार खात्यास जमाखर्च झाल्यावर त्या खात्यांस नफा होईल तो त्या खात्यांस नांवें लिहून नफातोटाखातीं जमा करावा व तोटा येईल तो त्या खात्यांस जमा करून नफातोटाखातीं नांवें लिहावा ह्मणजे जिन्नसवार खातीं पुरीं होतील. कित्येक सावकार जिन्नसवार खातीं न घालितां खरेदीविक्रीखातें घालितात व खरेदीची रकम या खात्यांचे नांवें लिहून विक्रीचा पैसा याच खातीं जमा करितात.

६१ प्र०—रवानगीखातें ह्मणजे काय ?

उ०—कोणास पैसा पोंचण्यासाठीं अगर माल खरेदीसाठीं रुपये पाठविणें ते रवानगीखात्यास नांवें लिहून पाठवितात आणि तो मालकास पोंचल्यावर किंवा स्वत: मालकानें माल खरेदी केल्यावर मालकाचे अगर खरेदीखात्याचे नांवें लिहून रवानगीखातीं जमा करितात; या खात्यास रवानगीखातें असें ह्मणतात.

६२ प्र०—अमानतखातें ह्मणजे काय ?

उ०—कोणी मनुष्यानें कांहीं रुपये आपणाकडे पाठविले, परंतु कोणत्या खातीं जमा करावयाचे अथवा कोणाकडून आलेले किंवा स्वत:चे हें कळविलें नाहीं तर ती रकम ज्या खातीं जमा करून ठेवितात त्यास अमानतखातें ह्मणतात.

६३ प्र०—ठेवखातें ह्मणजे काय ?

उ०—कोणी मनुष्यानें कांहीं रुपये ठेव आणून ठेविली तर ठेवखातें या नांवानें ती रकम जमा करितात, व परत देतेवेळीं त्याच खात्यास नांवें लिहून देतात, अशा खात्यास ठेवखातें ह्मणतात.

६४ प्र०—सूटबट्टाखातें ह्मणजे काय ?

उ०—माल खरेदी केला त्याबद्दल बट्टा मिळाला तर ती रकम ज्या खातीं जमा करितात, व आपण दुसऱ्यास मालाबद्दल बट्टा दिला तर ज्या खातीं नांवें लिहितात; याचप्रमाणें व्याजाची अथवा दुसरे कोणतेही प्रकारची सूट मिळाली अगर दिली तर ज्या खातीं जमा अगर नांवें लिहितात, त्यास सूटबट्टाखातें असें ह्मणतात.

६५ प्र०—व्याजखातें ह्मणजे काय ?

उ०—लोकांकडे जितके रुपये व्याजाबद्दल येणें होतील तितके व्याजखातीं जमा करून त्यांचे नांवें लिहावें, व आपण दुसऱ्याचें व्याज देणें होईल तर तें व्याजखातीं नांवें लिहून ज्याचें देणें त्याचें जमा करावें.

सालअखेर व्याजाचा हिशेब करून कुळवार नांवें लिहून व्याजखातीं जमा करितात व आपण दुसऱ्याचें देणें होईल तें त्याचे नांवें जमा करून व्याजखातीं खर्च ( नांवें ) लिहितात. कित्येक असें करीत नाहींत.

६६ प्र०—जे लोक वर्षाचेवर्षास व्याज आकारून त्याचा जमाखर्च करीत नाहींत त्यांजकडेस व्याजाचा पैसा आला तर जमाखर्च कसा करितात ?

उ०—ज्यानें व्याजाबद्दल पैसा आणून दिला असेल त्याचे नांवें तो जमा करून त्याचेच नांवें व्याजाबाबद येणें लिहून व्याजखातीं जमा करितात.

६७ प्र०—तसलमातखातें ह्मणजे काय ?

उ०—एकादे मनुष्यापाशीं एकादे कामासाठीं अभोगत कांहीं रकम दिली तिच्या खर्चाचा हिशेब समजणें आहे तर ती घेणाराचे गुजारतीनें ज्या खातीं लिहून ठेवितात त्यास तसलमातखातें ह्मणतात.

६८ प्र०—नफातोटाखातें ह्मणजे काय ?

उ०—कोणत्याही जिनसाचे व्यापारांत नफा अगर तोटा झाला तर ज्या खातीं तो जमा अगर नांवें लिहितात, अथवा येणें असलेले रुपये बुडाले तर ज्या खात्यास नांवें लिहितात त्यास नफातोटाखातें असें ह्मणतात.

६९ प्र०—वाजघस्तखातें ह्मणजे काय ?

उ०—पैसा खर्चखातीं नांवें पडून गेला आणि त्यांपैकीं कांहीं परत आला तर तो ज्या खातीं जमा करितात त्यास वाजघस्तखातें असें ह्मणतात.

७० प्र०—तोंडमिळवणीचीं खातीं कोणतीं ?

उ०—ज्या खात्यांचें येणें व देणें पुढील सालास उतरावें लागत नाहीं

७१ प्र०—कोणत्या मनुष्याकडे येणें व देणें किती हें लौकर कशावरून समजेल?

उ०—खतावणीवरून समजेल.

७२ प्र०—सरसालांत जमा किती आली व खर्च किती झाला हें कोठें समजेल?

उ०—बारमाही तेरजांत समजेल.

७३ प्र०—धीतओळ कशास ह्मणतात?

उ०—कागदाच्या बंदावर दोन्ही आंगांस सारखी कोरी जागा सोडून मध्यें ओळ काढितात तीस धीतओळ असें ह्मणतात.

७४ प्र०—ताळेबंद ह्मणजे काय?

उ०—ताळेबंद ह्मणजे कीर्दीवरून आणि खतावणीवरून महिन्याचा अगर वर्षाचा जो एकंदर हिशेब दुबेरजी रकमा गाळून लिहितात तो.

७५ प्र०—मनोती ह्मणजे काय?

उ०—मनोती ह्मणजे सावकाराकडून कर्जाऊ रुपये घेतले असतां त्यांतून त्या सावकाराच्या रीतीप्रमाणें जी शेंकडावण कापून देतात ती.

७६ प्र०—दुबेरजी ह्मणजे काय?

उ०—एक वेळ जमेकडे अगर खर्चाकडे पडलेली रकम पुन्हा एक वेळ अगर अधिक वेळ खर्चाकडे अगर जमेकडे दाखल करावी लागते त्यास दुबेरजी असें ह्मणावें.

७७ प्र०—दुबेरजी करण्याचा प्रसंग केव्हां येतो?

उ०—रकम वास्तविक ज्याचे खातीं जमा अगर खर्च पडावयाची असेल त्याचे नांवें पडली नसून दुसऱ्याचे खातीं पडली असेल तर जमाखर्च बरोबर होण्याकरितां दुबेरजी करावी लागते, किंवा आज मितीस ज्या इसमाकडे येणें देणें आहे तें इतर दुसरे कोणापासून यावयाचें अगर द्यावयाचें असा करार वगैरे झाला असल्यास दुबेरजी करावी लागते.

७८ प्र०—दुबेरजी करितेवेळेस मुख्य गोष्टी कोणकोणत्या ध्यानांत ठेविल्या पाहिजेत?

उ०—मुख्य गोष्टी लक्षांत ठेवण्याच्या ह्या आहेत कीं, झालेल्या व्यवहारापासून शिल्लक* वाढली आहे, किंवा+कमी झाली आहे, अगर होती‡ ति-

* रकम जमा करणें असून चुकीनें खर्ची पडली तर शिल्लक वाढते.

+ रकम खर्ची पडावयाची असून जमा झाली ह्मणजे शिल्लक कमी होते.

‡ रकम जमा व्हावयाची जमा झाली व खर्ची पडण्याची खर्ची पडली परंतु चुकीनें भलत्या खात्यास पडली तर शिल्लक तितकीच रहाते.

तकीच राहिली आहे. शिल्लक वाढली असेल तर जमाखर्च करितेवेळेस तं रकम जमेकडे खर्चापेक्षां एक वेळ अधिक दाखल करावी, व अखेर ज्या खा त्याकडील येणें त्या रकमेनें कमी झालें असेल अगर ज्या खात्याकडील देणें आ पणास झालें असेल त्या खात्याकडे ती रकम जमा करावी. शिल्लक कमी झालं असेल तर रकम खर्चाकडे एक वेळ अधिक पडे असें करावें, व ज्या इसमा कडे आपलें येणें अखेर राहील किंवा ज्याचें देणें आपणास कमी होईल त्याचे नांवें ती रकम अखेर घालावी. व शिलकेंत तफावत झाली नसल्यास जमेकडे व नांवेंकडे सारखे वेळ रकम पडून ज्याकडून येणें अगर ज्याला देणें राहत अ· सेल त्याचे नांवें खर्च अखेर अगर जमा अखेर दाखल करावी.

७९. प्र०—एकानें कांहीं रुपयांची रवानगी केली, पुढें रुपये नेणारास चो· रांनीं ठार मारून ते रुपये नेले तर ही बातमी रुपये रवाना करणारास समज· ल्यावर जमाखर्च कसा करावा ?

उ०—जितके रुपये रवाना केले असतील तितके रवानगीखातीं जमा करून नफातोटाखातीं खर्च लिहावे.

८० प्र०—एकादे मनुष्याकडे कर्जाऊ येणें असलेले रुपयांपैकीं कांहीं रुपये दिले, आणि राहिलेल्या रुपयांचा दस्तऐवज करून दिला तर त्याचा जमाखर्च कसा करावा ?

उ०—जितके रुपये येणें असतील तितके त्याचे जमा करून दस्तऐव· जाची रकम त्याचे नांवें लिहावी.

८१ प्र०—खतावणींत रकम असून कीर्दींत नाहीं अशी रकम कोणती ?

उ०—अखेर व अवल आढाव्याची.

८२ प्र०—आढावा ह्मणजे काय व त्याचे प्रकार किती आहेत ?

उ०—वर्षाचे आरंभीं अगर शेवटास आपलें येणें किती व आपण देणें किती हें समजण्यासाठीं जो कीर्दीवर जमाखर्च करितात त्यास आढावा असें ह्मणतात, त्याचे प्रकार दोन आहेत—अखेर आढावा व अवल आढावा.

८३ प्र०—अखेर आढावा काढण्यापूर्वी काय करावें लागतें ? व तो कसा काढतात.

उ०—अखेर आढावा काढण्यापूर्वी कीर्द व खतावणी बरोबर आहेत किंवा नाहीं तें पहाण्याकरतां कीर्दींतील बारा महिन्यांचे जमेची व खर्चाची बे- रीज घेऊन जमेचे बेरजेंतून खर्चाची बेरीज वजा करून बाकी राहील ती साल- अखेरचे शिलकेस मिळाली ह्मणजे कीर्द बरोबर आहे; त्याचप्रमाणें खतावणीव-

रून बारा महिन्यांचें तेरीज करून शिल्लक निघेल ती कीर्दीचे शिलकेस मिळाली म्हणजे कीर्दीतील सर्व रकमा खतावणींत बार झाल्या असें समजावें. नंतर आढावा काढण्यास आरंभ करावा, तो असा:—सालअखेर खातेवार जें येणें निघालें असतें तें ज्याचे त्याचे नांवें जमा करून भांडवलखात्यास अगर खाजगतखात्यास एक रकमेनें नांवें ल्याहावें. व खातेवार देणें निघालें असतें तें ज्याचे त्याचे नांवें लिहून भांडवलखात्यास अगर खाजगतखात्यास एक रकमेनें जमा करावें.

८४ प्र०—अवल आढावा म्हणजे काय?

उ०—सालाचे आरंभास येणें व देणें किती हें समजण्यासाठीं जो जमाखर्च करितात त्यास अवल आढावा असें म्हणतात. सालअखेर येणें निघालेलें अखेर आढाव्यांत त्यांचे नांववार जमा केलेलें असतें तें परत त्यांचे नांवावर लिहून खुद्दखातीं एक रकमेनें जमा करितात व देणें असलेलें त्यांचें जमा करून खुद्दखातीं एक रकमेनें नांवें लिहितात.

८५ प्र०—अवल व अखेर आढाव्यांत कोणकोणतीं खातीं येतात?

उ०—ज्या खात्यांकडे देणें व येणें निघून तें पुढील सालीं त्या त्या खात्यांस न्यावें लागतें अशा प्रकारचीं खातीं येतात. तोंडमिळवणीचीं खातीं येत नाहींत. ( प्र० ९० पहा. )

८६ प्र०—अखेर व अवल आढावा यांत भेद कोणता?

उ०—अखेर आढाव्यांत येणें असलेले रुपये जमा करून देणें असलेले नांवें लिहितात; अवल आढाव्यांत ज्याजकडे जें येणें तें त्याचे नांवें लिहितात व देणें जमा करितात इतकाच काय तो भेद.

८७ प्र०—अखेर आढाव्यास देणें खर्चाकडे व येणें जमेकडे व अवल आढाव्यास येणें खर्चाकडे व देणें जमेकडे असा फरक असण्याचें कारण काय?

उ०—जमाखर्चांत मुख्य गोष्ट खात्यांची तोंडमिळवणी ही आहे व ती खुद्द खात्याशीं करावी लागते सबब अखेर आढाव्यास तोंडमिळवणीकरितां जमेकडे येणें व खर्चाकडे देणें असें काढावें लागतें; त्याचप्रमाणें अवल आढावा उतरावा तर आपलें जें येणें तें खर्चाकडे व देणें जमेकडे असें असलें पाहिजे, तसें होत नाहीं; सबब तो फरकानें उतरावा लागतो.

८८ प्र०—अखेर आढावा कोणत्या कागदावरून उतरितात?

उ०—खतावणींतील सरसालचे बाकीवरून उतरितात.

८९ प्र०—अवल आढावा कोणत्या कागदावरून उतरितात?

उ०—अवल आढावा मागील सालचे अखेर आढाव्यावरून उतरितात.

९० प्र०—अखेर आढाव्यांत जितकीं खातीं दाखल केलेलीं असतात तितकीं अवल आढाव्यांत येतात किंवा नाहीं?

उ०—तोंडमिळवणीचीं जीं खातीं असतात ह्मणजे पुढील सालास ज्यांची बाकी उतरावी लागत नाहीं, त्याशिवाय सर्व खातीं येतात.

९१ प्र०—सावकार लोक अखेर व अवल आदावा कीर्दीवर उतरितात किंवा नाहीं ?

उ०—सावकार लोक कीर्दीवर अखेर व अवल आदावा उतरीत नाहींत. याचें कारण, आपला अंदाज समजतो ह्मणून.

९२ प्र०—आदावा जर कीर्दीत उतरीत नाहींत तर देणें व येणें कशावरून समजतें ?

उ०—देण्यायेण्याचे खात्यावरून सालअखेरीस बाक्या काढून एक याद तयार करतात, त्यावरून पुढील सालीं ज्याचे त्याचे खात्यास बाक्या नेतात. ह्मणून देणें व येणें कोणाचें किती हें समजतें.

९३ प्र०—गुदस्त सालचें आपण देणें किती, व आपलें येणें किती, व शिल्लक काय, हें कोठें समजेल ?

उ०—सालमजकूरच्या कीर्दीत अवल आदाव्यांत पाहिलें असतां समजेल.

९४ प्र०—धान्याचे उत्पन्नाचा जमाखर्च कसा करितात ?

उ०—जें उत्पन्न येईल तें खाजगतखातीं जमा करून सरकारदस्तास वगैरे जो खर्च लागेल तो त्याच खातीं नांवें लिहावा. मक्तयानें शेत दिलें असल्यास मक्तयाची रकम मक्ता घेणाराचे नांवें लिहून खाजगतखातीं जमा करावी; व मक्तयाचे रुपये आल्यावर मक्तेदाराचे खात्यास जमा करावे.

९५ प्र०—सालअखेरीस रवानगीची पावती आली नाहीं तर काय करावें ?

उ०—रवानगीखातीं जमा करून शिल्लकेंत रोख अमुक, व रवानगी अमुक असा तपशील लिहावा. व पुढील सालाचे आरंभीं ती रकम रवानगीखातीं नांवें लिहावी.

९६ प्र०—तेरीज ह्मणजे काय ?

उ०—कारणपरत्वें जमाखर्चांतून वेगवेगळाले प्रकारच्या रकमा वेगवेगळ्या काढून त्यांच्या बेरजा करितात, त्यांस तेरीज ह्मणावें. घरगुती जमाखर्चांत दरएक जिनसाकडे व दरएक खर्चाचे सदराकडे किती पैसा लागला हें समजण्याकरितां माहेवार अगर सालवार तेरीज करितात त्यास कोठेंकोठें बोटखत असेंही ह्मणण्याचा पाठ आहे.

९७ प्र०—हुंडी ह्मणजे काय ? व ती ज्या इसमास पाहिजे त्यास ती कशी मिळावी ?

उ०—जर कोणी दुसऱ्यास अन्य ठिकाणीं पैसा देण्याकरितां आपले अडत्यावर चिठी दिली, तर तीस हुंडी असें ह्मणतात. ज्या इसमास हुंडी पाहिजे, त्याणें गांवांतील सावकाराकडेस जाऊन जितके रुपयांची हुंडी पाहिजे तितके रुपये हुंडणावळ ठरविली असेल त्यासुद्धां भरावे; ह्मणजे तो सावकार आपले अडत्यावर हुंडी देईल. ती घेऊन ज्यास रुपये देण्याचे त्याजकडेस ती डांकेतून पाठवावी, त्याणें पोंचल्यावर ती त्या अडत्यास दाखवून रुपये घ्यावे, व ज्याणें हुंडी पाठविली त्यास रुपये मिळाल्याबद्दल कळवावें.

९८ प्र०—हुंडीचे प्रकार किती व ते कोणते?

उ०—हुंडीचे तीन प्रकार आहेत. शाहाजोग, नामजोग, व धनीजोग.

९९ प्र०—शाहाजोग हुंडी कशास ह्मणतात?

उ०—ज्या हुंडीचे रुपये हुंडी नेणाऱ्या कोणत्याही लायक मनुष्यास मिळतात तिला शाहाजोग हुंडी असें ह्मणतात.

१०० प्र०—नामजोग हुंडी कशास ह्मणतात.

उ०—ज्या हुंडीचे रुपये हुंडींत ज्या मनुष्यास देण्याविषयीं लिहिलेले असतात त्यासच ते मिळतात, इतरास मिळत नाहींत, तीस नामजोग हुंडी असें ह्मणतात.

१०१ प्र०—धनीजोग हुंडी कशास ह्मणतात?

उ०—ज्या मनुष्यानें रुपये देऊन हुंडी घेतली त्यासच ते मिळतात इतरास मिळत नाहींत, तीस धनीजोग हुंडी असें ह्मणतात.

१०२ प्र०—जाबीहुंडी ह्मणजे काय?

उ०—सावकाराकडे रुपये जमा करून हे रुपये अमुक मनुष्यास पोंचवून जबाब आणून द्यावा असें सावकारास सांगितलें ह्मणजे सावकार रुपये पोंहचल्याचा जबाब आणवून देतो; रुपये भरणारास हुंडीपत्र घेण्याची जरूर नाहीं अशा हुंडीस जाबीहुंडी ह्मणावें.

१०३ प्र०—दर्शनीहुंडी ह्मणजे काय?

उ०—ज्या हुंडीवरून हुंडी सावकाराचे दुकानीं नेऊन दाखवितांच पैसा मिळतो ती.

१०४ प्र०—मुदतीची हुंडी ह्मणजे काय?

उ०—ज्या हुंडींत हुंडी दाखविल्यापासून अमुक रोजांनीं पैसा द्याव असा मजकूर असतो ती. या प्रकारची हुंडी सावकाराकडे नेली ह्मणजे तो हुंडीची नक्कल करून घेऊन तिजवर मिती घालून देतो, मग मुदत भरल्यावर पैसा

मिळतो. कारणपरत्वें मुदतीची वाट पाहण्यास सवड नसल्यास मुदतीचे रोजाबद्दल व्याज कापून घेऊन पैसा देण्याची सावकार लोकांत वहिवाट आहे. बंद मुदतीची हुंडी ह्मणून दुसरा एक प्रकार आहे त्यांत हुंडी लिहिलेल्याचे तारिखेपासून अमुक रोजांनीं पैसा द्यावा असें लिहिलें असतें. ती मुदत भरल्यावर ती हुंडी दर्शनी होत्ये; अशी हुंडी लिहिण्याची वहिवाट फार करून उत्तर हिंदुस्थानांत आहे.

१०५ प्र०—लहणीहुंडी ह्मणजे काय ?

उ०—सावकारास ज्या शहरांत आपली अडत नाहीं त्या गांवीं हुंडी करणें झाल्यास अथवा ज्या सावकाराचें आपलेकडे खातें नाहीं त्यावर हुंडी करणें झाल्यास तो हुंडी देऊन तावडतोब हुंडीचा ऐवज अगर तितके ऐवजाच्या दुसरे सावकारांवर हुंड्या त्या सावकाराकडे पाठवितो अशा हुंडीस लहणीहुंडी ह्मणतात.

१०६ प्र०—भरपाई ह्मणजे काय ?

उ०—हुंडी इत्यादिकांचा पैसा पदरांत घेऊन त्याच हुंडी इत्यादिकांवर रुपये घेऊन भरून पावलों वगैरे जो लेख लिहून देतात त्यास भरपाई असें ह्मणतात.

१०७ प्र०—हुंडीखातें ह्मणजे काय व हुंडीचा जमाखर्च किती प्रकारांनीं करितात ?

उ०—कोणी मनुष्यानें आपणाकडे रुपये जमा करून हुंडी मागितल्यास त्याचा जमाखर्च ज्या खात्यास करितात, तें हुंडीखातें. तीन प्रकारांनीं हुंडीचा जमाखर्च होतो, तो येणेंप्रमाणें:—

**पहिला प्रकार.**—हुंडी मागणाराचे रुपये हुंडीखात्यास जमा करून अडत्यावर हुंडी द्यावी, हुंडीचे रुपये भरल्याबद्दल अडत्याचें पत्र आल्यावर हुंडीखात्यास नांवें लिहून अडत्याचे नांवें ते रुपये जमा करावे.

**दुसरा प्रकार.**—ज्या मनुष्यानें आपणाकडे रुपये जमा करून हुंडी घेतली त्याचे नांवें रुपये जमा करावे, व हुंडीचे रुपये भरल्याचा जबाब आल्यावर जमा करणाराचे नांवें ती रकम लिहून अडत्याचे नांवें जमा करावी.

**तिसरा प्रकार.**—एखादे मनुष्यानें आपल्याकडेस रुपये जमा करून हुंडी मागितली, तर ज्यावर आपण हुंडी लिहिली त्याचे नांवें ते रुपये जमा करून ती हुंडी द्यावी, हुंडीचे रुपये अडत्यानें भरल्यावर तिचा जमाखर्च करावयास नको. कारण सर्व हुंड्यांची बारनिशी असते.

१०८ प्र०—हुंडी खरेदी अगर विक्री केली तर जमाखर्च कसा करितात ?

उ०—हुंडी खरेदी घेतली तर त्याबद्दल दिलेली रकम हुंडीखरेदीविक्री या खातीं नांवें लिहितात, व आपण दुसऱ्यास विकली तर जे रुपये येतील ते याच खातीं जमा करितात. ही गोष्ट जे नेहमीं हुंड्या खरेदीविक्री करण्याचा धंदा करितात त्यांस लागू आहे; परंतु कोणी इसमानें आपले जवळची हुंडी रुपयांचे जरूरीमुळें विकली अगर रुपये दुसरे गांवीं पाठविण्याकरितां हुंडी विकत घेतली तर त्यानें हुंडी खरेदीविक्रीखातीं लिहिण्याची जरूर नाहीं. त्यानें ज्या इसमाकडून रुपये आले असतील किंवा ज्यास रुपये द्यावयाचे असतील त्याचे खातीं जमा किंवा नांवें ल्याहावे.

१०९ प्र०—हुंडणावळीबद्दल मिळालेला पैसा कोणत्या खातीं जमा करितात व आपण दिलेला पैसा कोणत्या खातीं नांवें ( खर्च ) लिहितात ?

उ०—हुंडीकसरखातें या नांवानें खातें घालून हुंडणावळीबद्दल मिळालेला पैसा या खात्यास जमा करून आपण दिलेला पैसा याच खात्यास नांवें ( खर्च ) लिहितात.

११० प्र०—हुंडी पटली नाहीं तर व्यवस्था काय करावी ?

उ०—हुंडीपत्र परत आणून दिल्यावर पूर्वी ज्या खात्यास त्या हुंडीचे रुपये जमा झाले असतील त्या खात्यास नांवें ( खर्च ) लिहून जमा करणाराचे रुपये परत द्यावे.

१११ प्र०—खोका कशास ह्मणतात ?

उ०—हुंडी दिल्यावर अडत्यास स्वतंत्र पत्र असें लिहितात कीं तुह्मांवर अमुक रुपयांची, अमुक मुदतीची, अमुक राखिल्याची, व अमुक मितीची ( तारखेची ) शाहाजोग अथवा नामजोग अथवा धनीजोग हुंडी दिली आहे; या पत्रास खोका असें ह्मणतात.

११२ प्र०—भलावणपत्र ह्मणजे काय ?

उ०—अमुक मनुष्यास अमुक मुदतींत अमुक रुपयेपर्यंत द्यावे असें जें सावकारावर पत्र देतात त्याचें नांव भलावणपत्र.

११३ प्र०—सकाईनकाई ह्मणजे काय ?

उ०—हुंडी खडी राहिल्यास त्याबद्दलचे नुकसानीचा पैसा हुंडी लिहिणारापासून भरून घेतात त्यास सकाईनकाई असें ह्मणतात. ह्याचा ठराव शेंकड्यावर असतो.

